**कारंजा रमजानपूर (संग्राहक ) बृहत ल.पा योजना ता. बाळापूर जि. अकोला या योजनेस रू. २११.१५ कोटी किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र.सुप्रमा २०१८/(२५५/२०१८)/ लपा**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: २० ऑक्टोबर, २०१८.

**पहावे:-** १. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ नागपूर यांचे निर्णय क्र. काता -७/६४९/१७५/२००९/ नया अंदुरा / प्रमा दि. १८.०८.२००९.
२. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ नागपूर यांचे पत्र क्र. २६२९/विपाविम/काता - ७/धा.क्र. ७/५/ २०११-१२ दि. २६.०३.२०१२
३. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/(३५/२०१५)/जसं(आ), दिनांक ९ सप्टेंबर, २०१५.
४. शासन शुद्धिपत्रक क्र. संकीर्ण-२०१५/(३५/२०१५)/जसं(आस्था), दिनांक २२ जून२०१६
५. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ नागपूर यांचे जा.क्र. ४७५९/विपाविम/काता - ७(१)/ (५४१/२०१६)/२०१८ दि. ११.०५.२०१८.

**प्रस्तावना:**

अकोला जिल्ह्यातील खारपाण पट्ट्यातील मौ. कारंजा रमजानपूर गावाजवळून वाहणाऱ्या पाणखस नदीवर दक्षिणेस नया अंदूरा संग्राहक लपा योजनेस संदर्भ क्र. १ येथे नमूद विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ नागपूर यांच्या निर्णयानुसार एकूण अंदाजित रू.४६.२१ कोटी (दरसूची २००८-०९) ( रू. शेचाळीस कोटी एकवीस लक्ष ) इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. यामध्ये कामाकरिता रू. ४३.२३ कोटी ( त्रेचाळीस कोटी तेविस लक्ष ) व अनुषंगीक खर्चाकरीता रू. २.९८ कोटी (दोन कोटी अठ्ठ्यान्नव लक्ष ) तरतुद समाविष्ट होती.

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांच्या नियामक मंडळाच्या ४९ व्या बैठकीत ठराव क्र. ४८/११ अन्वये या प्रकल्पाचे नया अंदुरा (संग्राहक ) बृ. ल.पा. हे नाव बदलून कारंजा रमजानपूर (संग्राहक ) बृहत ल.पा. योजना असे करण्यात आल्याचे संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये कळविले आहे. सदर प्रकल्पामुळे अकोला जिल्ह्यातील बाळापूर तालुक्यातील ६ गावातील १७९० हे. सिंचन क्षेत्रास लाभ मिळणार आहे. हा प्रकल्प जिगांव प्रकल्पाच्या पाणलोट क्षेत्रात येतो.

सदर प्रकल्पावर माहे जुन २०१७ अखेर रु.९२.६८ कोटी इतका खर्च झाला असून प्रकल्पाची उर्वरित कामे मार्च २०२० अखेर पूर्ण करण्याचे नियोजित आहे. प्रकल्पीय उद्दिष्ट्ये निर्धारित कालावधीत पूर्ण करण्यासाठी प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त होणे आवश्यक आहे.

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ नागपूर यांच्या दि.३१.०१.२०१८रोजी झालेल्या नियामक मंडळाच्या ६८ व्या बैठकीत सदर प्रकल्पास प्रथम सु.प्र.मा.देणेचा प्रस्ताव मा.मंत्री मंडळाच्या विचारार्थ सादर करावा असा ठराव पारित करण्यात आलेला आहे.

त्यानुसार एकूण रू. २११.१५ कोटी (दरसूची २०१६-१७) इतक्या किंमतीचा प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेच्या विचारार्थ संदर्भ क्र.५ अन्वये सादर केला होता.

संदर्भ-१ व २चे शासन निर्णयानुसार विदर्भ व मराठवाड्यातील सिंचन प्रकल्पांना सु.प्र.मा. देणेचे अधिकार संबंधित सिंचन विकास महामंडळास प्रदान करण्यात आले आहेत. तथापि सदर शासन निर्णयातील परिच्छेद ४ नुसार नियामक मंडळाने सु.प्र.मा. प्रस्ताव मा. मंत्रीमंडळाच्या विचारार्थ सादर करावा असा निर्णय घेतल्यास सु.प्र.मा.प्रस्ताव मा.मंत्रीमंडळास सादर करणेची तरतूद आहे.

मा.मंत्रीमंडळाने बांधकामाची सद्यस्थिती,दरसूचीतील बदल, नविन भूसंपादन कायदा २०१३ च्या तरतूदी लागु झाल्याने भूसंपादन व पुनर्वसन खर्चात झालेली वाढ, संकल्पचित्रातील फेरबदल, ग़ौण खनिज शुल्काच्या दरात झालेली सुधारणा इत्यादी किंमतवाढीची कारणमीमांसा यांचा सखोल परामर्श घेऊन कारंजा रमजानपूर (संग्राहक ) बृहत ल.पा योजना ता. बाळापूर जि. अकोला या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१६-१७ व सार्वजनिक बांधकाम विभाग दरसूची २०१६-१७ वर आधारित **रू. २११.१५ कोटी** किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा जाणीवपूर्वक निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

कारंजा रमजानपूर (संग्राहक ) बृहत ल.पा योजना ता. बाळापूर जि. अकोला या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१६-१७ व सार्वजनिक बांधकाम विभाग दरसूची २०१६-१७ वर आधारित **रू.२११.१५ कोटी** किंमतीस (प्रत्यक्ष कामासाठी एकूण रु.१९९.९२ कोटी व अनुषंगिक खर्च रु ११.२३ कोटी ) खालील अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा **परिशिष्ट-"अ"** मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर प्रकल्पाच्या प्रथम सुप्रमा प्रस्तावामध्ये अंतर्भूत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.

२) प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरू असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.

३) संपूर्ण प्रकल्प हा प्रस्तावित प्रथम सु.प्र.मा. किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

४) सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वित करण्याच्या विविध टप्प्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहीत आहे असे धरता येणार नाही. सदर सु.प्र.मा. देणेपूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास ही सुप्रमा दिल्याने ती नियमीत झालेली आहे असे गृहीत धरता येणार नाही.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,मुख्य लेखाशीर्ष ४७०२लहान पाट- बंधाऱ्यावरील भांडवली खर्च,(८०) सर्वसाधारण (१९०)सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०५), योजनांतर्गत(०२)(०७)विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान(४७०२ ५१०-०१)या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व महामंडळाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**ठळक बाबी**

अ) योजनेचे सिंचन क्षेत्र/ सिंचन क्षमता :- १७९० हेक्टर

ब) या योजनेमूळे होणारा पाणीसाठा :- १०.९२ द. ल. घ.मी.

क) प्रति स.घ.मी. पाणीसाठा किंमत :- रु. १,९३,३६०/- सघमी(मापदंड रू.२,५८,६३३/- सघमी.)

ड) लाभव्यय गुणोत्तर :- ०.६२२ (शासन परिपत्रकाप्रमाणे योजना खारपाणपट्ता क्षेत्रातील असल्याने लाभव्यय गुणोत्तर विचारात घ्यावयाची आवश्यकता नाही)

इ) आर्थिक परतावा दर :- ६.२२<१२

सदर शासन निर्णय दिनांक १८/०९/२०१८ रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळाचे निर्णयाचे अनुषंगाने तसेच वित्त विभागाच्या संदर्भ क्र. विवि/शिकाना/२०७/२०१८ व नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९३/१४३४ दि.०५/०६/२०१८ अन्वये सहमती दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेल्या सुधारित प्रशासकीय मान्यतेची नोंद लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवही मध्ये सन २०१८-१९अ.क्र.१८९वर घेण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०२०१६३९५६९३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: CN = Milind Anand Wani, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2018.10.20 16:49:20 +05'30'

**सहपत्र** : परिशिष्ट -"अ"

**(मि. आ. वाणी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

३) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) मा.विरोधी पक्ष नेते,विधानसभा / विधानपरिषद/ विधानमंडळ, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई
५) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
६) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
७) वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय,मुंबई-३२.
८) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय,मुंबई-३२.
९) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर.
१०) महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
११) मुख्य अभियंता , (विशेष प्रकल्प ) जलसंपदा विभाग,अमरावती.
१२) आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) अधिक्षक अभियंता,अकोला सिंचन मंडळ अकोला.
१४) जिल्हाधिकारी,अकोला.
१५) उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१६) अर्थ शाखा १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१७) कार्यासन लपा संग्रहार्थ.

## परिशिष्ट-“अ”

शासन निर्णय क्रमांक सुप्रमा-२०१८/(२५५/१८)/लपा दि.२०-१०-२०१८चे सहपत्र कारंजा रमजानपूर (संग्राहक ) बृहत ल.पा योजना ता. बाळापूर जि. अकोला, या प्रकल्पाच्या प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेचा उपशीर्ष निहाय तपशील.

**(किंमत रू. कोटी)**

| अ.क्र. | तपशील | प्रस्तावित सु.प्र.मा.नुसार (दरसूची २०१६-१७) |
|---|---|---|
| १ | अ-प्राथमिक | ०.१३ |
| २ | ब-भु-संपादन | |
| | I. भुसंपादन | ८७.४५ |
| | II. पुनर्वसन | १८.७९ |
| | **एकुण** | **१०६.२४** |
| ३ | सी-कामे | ८८.४६ |
| ४ | डि-विमोचक | ०.४७ |
| ५ | एच -निर्गमन | ०.३८ |
| ६ | के - इमारती | ०.१५ |
| ७ | एम-वृक्षारोपण | ०.४५ |
| ८ | ओ-संकिर्ण | १.७९ |
| ९ | पी-देखभाल | १.५८ |
| १० | आर-दळणवळण | ०.२८ |
| ११ | एक्स-एनव्हायरमेंट | ०.०० |
| | **एकूण** | **१९९.९२** |
| | **अनुषंगीक खर्च** | **११.२२** |
| | **एकूण** | **२११.१५** |

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: CN = Milind Anand Wani, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2018.10.20 16:49:37 +05'30'

**(मि. आ. वाणी )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**